**राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान (NMSA) अतंर्गत कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) खालील सन २०१७-१८ मधील केंद्रशासन हिस्स्यातील सर्वसाधारण प्रवर्गातील रु.११.२० लक्ष व राज्य शासन हिस्स्यातील रु. ७.४७ लक्ष असा एकुण १८.६७ लक्ष अखर्चित निधी पुनर्जिवीत करुन चालू आर्थिक वर्ष सन २०१८-१९ मध्ये विनियोगात आणण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शाशेअ-२०१७/प्र.क्र.१८ /८अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ७ फेब्रुवारी, २०१९

**संदर्भ :-**

**(१)** GOI Letter No.२-३/२०१७-RFS-१११,Min of Agriculture & farmers welfare Dt.२४.४.२०१८,
**(२)** कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.कृ.आ.आ.-२०१७/कोक्षेवि/निधीवि /प्र.क्र.२३ /२७५/ रासक, दि.१ ऑगस्ट, २०१८.
**(३)** शासन निर्णय क्र.०३१७/प्र.क्र.१८/राकृवियो कक्ष, दिनांक- १३ एप्रिल,२०१७.

**प्रस्तावना :-**

सन २०१५-१६ पासुन कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रम ६०:४० या प्रमाणात केंद्र व राज्य हिस्सा या तत्त्वावर राबविण्यात येत आहे. केंद्र शासनाने त्यांच्या दिनांक २४.०४.२०१८ **(संदर्भ क्र.१)** च्या पत्रान्वये सन २०१७-१८ चा अखर्चित निधी प्रस्तुत योजनेतील मंजूर बाबींवर विनियोग करण्यास पुनर्प्रमाणित करण्यास मान्यता देत असल्याबाबत कळविले आहे.

त्यास अनुसरुन सन २०१७-१८ मधील अखर्चित सर्वसाधारण प्रवर्ग केंद्र हिस्सा रु.११.२० लक्ष, अनुसूचित जाती रु.३५.६४ लक्ष व अनुसूचित जमाती रु.३९.४७ लक्ष प्रमाणे एकूण केंद्र हिस्सा रक्कम रु.८६.३१ लक्ष अखर्चित निधीपैकी सर्वसाधारण घटकातील अखर्चित केंद्र हिस्सा रक्कम रु.११.२० लक्ष व त्यास पूरक राज्य हिस्सा रु.७.४७ लक्ष याप्रमाणे सदर रु.१८.६७ लक्ष अखर्चित निधी चालु आर्थिक वर्ष सन २०१८-१९ मध्ये पुनर्ज्जिवीत करुन ती रक्कम सर्वसाधारण प्रवर्गाखाली खर्च करण्यासाठी कृषी आयुक्तालयास उपलब्ध करुन देण्याची व सदर रक्कम बी.डी.एस. प्रणालीवर वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने आता शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :--**

१. राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान (NMSA) अतंर्गत कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमातील केंद्रशासनाच्या हिस्स्यातील सर्वसाधारण प्रवर्गातील रु.८६.३१ लक्ष अखर्चित निधीपैकी सर्वसाधारण घटकातील सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील अखर्चित केंद्र हिस्सा रु.११.२० लक्ष व त्यास पूरक राज्य हिस्सा रु.७.४७ लक्ष याप्रमाणे रु.१८.६७ लक्ष रक्कम सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात पुर्नजिवीत करुन कृषी आयुक्तालयास बी.डी.एस. प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

२. उपरोक्त निधीमधून होणारा खर्च हा पुढील लेखाशिर्षाखाली नोंदवून तो त्याच लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता मंजुर असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

| प्रवर्ग | लेखाशिर्ष (केंद्र हिस्सा) |
|---|---|
| सर्वसाधारण | मागणी क्र.डी-३,<br>२४०१, पीक संर्वधन-<br>१०९-विस्तार व शेतकरी प्रशिक्षण-<br>(०१)माहिती व प्रचार- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-<br>(०१)(५१), कृषि उन्नती योजना-राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान -अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम (केंद्र पुरस्कृत योजना)- ६०% केंद्र हिस्सा (संकेतांक २४०१ ९५५४) ,३३- अर्थसहाय्य |

३) सदर निधीच्या प्रमाणात आवश्यक असणारा राज्य हिस्स्याचा रु.७.४७ लक्ष (रु.सात लक्ष व सत्तेचाळीस हजार फक्त) एवढया निधीस या शासननिर्णयाद्वारे शासनाची मान्यता देण्यात आहे.

४) वरील निधीमधुन होणारा खर्च हा पुढील लेखाशिर्षाखाली नोंदवून तो त्याच लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता मंजुर असलेल्या तरतुदीतुन भागविण्यात यावा.

| प्रवर्ग | लेखाशिर्ष (राज्य हिस्सा) |
|---|---|
| सर्वसाधारण | मागणी क्र.डी-३,<br>२४०१, पीक संर्वधन-<br>१०९-विस्तार व शेतकरी प्रशिक्षण-<br>(०१)माहिती व प्रचार- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-<br>(०१)(५३), कृषि उन्नती योजना-राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान -अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम (केंद्र पुरस्कृत योजना)- ४०% राज्य हिस्सा (संकेतांक २४०१ ए२७२) ,३३- अर्थसहाय्य |

५) सदर योजनेची अंमलबजावणी केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांमधील अवर्षण प्रवण क्षेत्र घटकाच्या मार्गदर्शक सूचनांनूसार तसेच संदर्भाधीन अ.क्र. ३ येथील उन्नत शेती समृद्ध शेतकरी अभियानाच्या दिनांक १३ एप्रिल, २०१७ च्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांनूसार योजनेची अंमलबजावणी करण्यात यावी.

६) प्रत्येक महिन्याला योजनेची भौतिक आणि आर्थिक प्रगती याबाबतची माहिती अद्ययावत करण्यात यावी व राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांसोबतच्या परिशिष्ट-३ मध्ये भरण्यात यावी व सदरची माहिती राज्य शासनाकडेसुद्धा पाठविण्यात यावी.

७) योजनेचा सविस्तर त्रैमासिक प्रगती अहवाल पुढील त्रैमासिकाच्या पहिल्या महिन्यांच्या १० तारखेपर्यंत त्याचप्रमाणे वार्षिक प्रगती अहवाल आर्थिक वर्ष संपल्यानंतर ३ महिन्यांच्या कालावधीत कृषी व सहकार विभाग, कृषी मंत्रालय, भारत सरकार यांच्याकडे तसेच राज्य शासनाकडे पाठविण्यात यावा.

८) सन २०१८-१९ मध्ये राज्यात सदर घटकाची अमंलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टीने निधी आहरण व वितरण करणेसाठी विविध स्तरावरील अधिकाऱ्यांना पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे -:

| अ. क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण आधिकारी |
|---|---|---|---|
| १. | आयुक्तालय स्तर | संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषि आयुक्तालय, पुणे |
| २. | विभाग स्तर | संबंधित विभागीय कृषी सह संचालक | संबंधित विभागीय कृषी सह संचालक कार्यालयातील लेखाधिकारी |
| ३. | जिल्हा स्तर | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी |
| ४ | उप विभागीय स्तर | संबंधित उप विभागीय कृषी अधिकारी | संबंधित उप विभागीय कृषी अधिकारी |
| ५. | तालुका स्तर | संबंधित तालुका कृषी अधिकारी | संबंधित तालुका कृषी अधिकारी |

९) कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमाच्या उद्दिष्टपूर्तीसाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधीन अ.क्र. १ येथे नमुद केलेल्या केंद्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असलेल्या सदर घटकाच्या मार्गदर्शक सुचना तसेच उपरोक्त नमूद अटी व शर्ती विचारात घेऊन उद्दिष्ट निहाय सविस्तर सुचना क्षेत्रिय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात.

१०) सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३ ,दि .०२, एप्रिल, २०१८ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन व सदर परिपत्रकातील अटी शर्तीची पूर्तता करुन तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६/२०१९/व्यय १, दिनांक २८.०१.२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०७१७०७३९८१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bharati Dinesh Dhuri

Digitally signed by Bharati Dinesh Dhuri
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ac65e55bc2f86ec37c6f25108b6605bc20e71b4742dd20d7e8f5e14cda6a2a7f, cn=Bharati Dinesh Dhuri
Date: 2019.02.07 17:11:37 +05'30'

**(भारती दि. धुरी)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे

२. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
३. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक
४. व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य कृषि उद्योग विकास महामंडळ, अंधेरी,मुंबई.
५. जिल्हाधिकारी (सर्व)
६. मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व जिल्हा परिषद)
७. मुख्य कार्यकारी अधिकारी,वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा,पुणे
८. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
९. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१०.जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
११.व्यवस्थापकीय संचालक, जिल्हा अग्रणी बँक (बँक ऑफ महाराष्ट्र, लोकमंगल ,पुणे)
१२.सर्व कृषि विकास अधिकारी/ सर्व उपविभागीय अधिकारी/ सर्व तालुका कृषि अधिकारी/
१३.सर्व मंडळ कृषि अधिकारी
१४.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर
१६.संचालक अर्थ व सांख्यिकी संचलनालय,मुंबई
१७.संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
१८. मुख्य लेखा परीक्षक,स्थानिक निधी लेखा,कोकण भवन, नवी मुंबई
१९.उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/ अमरावती,नागपुर
२०.उप संचालक, लेखा व कोषागारे कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/ अमरावती,नागपुर
२१.वित्त विभाग (का.व्यय १/ अर्थ ३), मंत्रालय, मुंबई
२२.का.२ अे, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२३.निवडनस्ती.